महाराष्ट्र राज्य हज समिती, मुंबई या कार्यालयातील “कक्ष अधिकारी” या पदावर प्रतिनियुक्तीने नियुक्ती करणेबाबत
श्रीमती खदिजा नाईकवाडे, कक्ष अधिकारी

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्र. कअनि-११२४/प्र.क्र.२१/प्रशा-२ (१४ब)**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : - २९ जुलै, २०२४

**शासन आदेश**

श्रीमती खदिजा नाईकवाडे, कक्ष अधिकारी, महिला व बाल विकास विभाग यांची महाराष्ट्र राज्य हज समिती, मुंबई या कार्यालयातील “**कक्ष अधिकारी**” या पदावर प्रथमत: ०३ वर्षाच्या कालावधीसाठी खालील नमूद अटी व शर्तींच्या अधिन राहून प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात येत आहे **:-**

अ) श्रीमती नाईकवाडे, कक्ष अधिकारी ज्या तारखेला प्रतिनियुक्तीच्या पदावर रुजू होतील त्या तारखेपासून प्रतिनियुक्तीच्या सेवेचा प्रारंभ होईल, त्यानंतर ३ वर्षांनी प्रतिनियुक्तीच्या पदाचा कार्यभार सूपूर्द करुन त्या त्यांच्या मूळ विभागात ज्या तारखेला रुजू होतील त्या तारखेला त्यांचा प्रतिनियुक्तीचा कालावधी समाप्त होईल.

ब) जर त्यांची सेवा लोकसेवेच्या हिताच्या दृष्टीने शासनाला आवश्यक वाटली तर प्रतिनियुक्तीचा कालावधी संपण्यापूर्वी कोणत्याही वेळी त्यांना परत बोलावून घेण्याचा अधिकार शासन/सक्षम प्राधिकाऱ्यास राहील.

क) जर त्यांची सेवा स्वीयेतर नियोक्त्याला आवश्यक वाटली नाही तर त्यांना मूळ विभागाकडे परत पाठविण्याची मुभा स्वीयेतर नियोक्त्याला राहील. मात्र याप्रमाणे परत पाठविण्यापूर्वी स्वीयेतर नियोक्त्याने शासनाला/सक्षम प्राधिकाऱ्याला तीन महिन्यांची नोटीस दिली पाहिजे.

ड) श्रीमती नाईकवाडे यांनी मूळ विभागाकडे परत जाण्याचा आपला उद्देश आहे अशी कमीत कमी तीन महिन्यांची लेखी नोटीस शासनाला/सक्षम प्राधिकाऱ्याला दिल्यानंतर त्यांना मूळ विभागाकडे परत येण्याची मुभा राहील.

२. महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा.....इ.) नियम १९८१ मधील नियम ४० (परिशिष्ट दोन व तीन ) मधील तरतुदी विचारात घेऊन महिला व बाल विकास विभाग व अल्पसंख्याक विकास विभागाने श्रीमती नाईकवाडे यांच्या प्रतिनियुक्तीबाबतच्या अटी व शर्ती ठरवाव्यात.

३. श्रीमती खदिजा नाईकवाडे, कक्ष अधिकारी यांच्या इतर सर्व प्रशासकीय बाबी महिला व बाल विकास विभागामार्फत हाताळण्यात येतील.

४. श्रीमती खदिजा नाईकवाडे, कक्ष अधिकारी यांना प्रतिनियुक्तीवरील नियुक्ती स्वीकारण्यासाठी महिला व बाल विकास विभागाने कार्यमुक्त करावे.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०७२९१६४०२०७८०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

GAJANAN SAHADEO PARAB

Digitally signed by GAJANAN SAHADEO PARAB
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, 2.5.4.20=23bc53b7f4f1ca24ad7fdd55b639979816e6e784d75d5396d0f50367308ecc8b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6E3168FC30A0E07A9B8D13F2A24C658F97BA49C1AB3A023B1606696C22202DDD, cn=GAJANAN SAHADEO PARAB
Date: 2024.07.29 16:55:02 +05'30'

**( ग.स.परब )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

श्रीमती खदिजा नाईकवाडे, कक्ष अधिकारी, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२ **(प्रशासकीय विभागामार्फत)**

**प्रत:-**

१) अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
२) प्रधान सचिव/सचिव, महिला व बाल विकास विभाग व अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
३) सह/उप सचिव (आस्थापना), महिला व बाल विकास विभाग व अल्पसंख्याक विकास विभाग,
यांना विनंती करण्यात येते की, प्रतिनियुक्तीच्या अटी व शर्ती नमूद केलेल्या आदेशाची एक प्रत या कार्यासनाकडे पाठविण्यात यावी.
४) कक्ष अधिकारी (कार्या-५), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
५) महाराष्ट्र राज्य हज समिती, मुंबई
६) निवड नस्ती/प्रशा-२ (१४ब)